GR-200404051141130001-0100

**बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थाने गट-अ श्रेणीतील अधिका-यांना वाटप करण्याबाबत..........**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शानिवा - १५९९ /प्र.क्र.६३३/९९/२३अ,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ नोव्हेंबर, १९९९.

संदर्भ :शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. शानिवा -१५९६/२०५३/प्र.क्र.८३/९६,दि.१३ मे,१९९६.

बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थाने गट-अ श्रेणीतील अधिका-यांना वाटप करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयानुसार मूळ वेतनावर आधारित विविध वेतनगट तयार करण्यात आलेले आहेत. ५ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार महाराष्ट्र शासनाने शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना दि.१ जानेवारी,१९९६ पासून सुधारित वेतनश्रेणी लागू केलेली आहे. त्यानुसार शासकीय निवासस्थाने वाटप करण्यासाठी सुधारित वेतनगट विहित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सध्याच्या निवासस्थानाचा प्रकार, सध्याच्या वेतनगटास अनुज्ञेय असलेली नियमित/संक्रमण निवासस्थाने आणि त्यांचे क्षेत्रफळ तसेच, त्या अनुषंगाने ५ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार नव्याने विहित करण्यात आलेल्या वेतनगटाचा/निवासस्थानाचा तपशील पुढे दर्शविल्याप्रमाणे विहित करण्यात येत आहे.

| निवास स्थानाचा प्रकार | सध्याचा वेतन गट (रुपये) | सुधारित वेतनगट (रुपये) | अनुज्ञेय निवासस्थान | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | | |
| | | | नियमित | क्षेत्रफळ चौ.फूट | संक्रमण | क्षेत्रफळ चौ.फूट |
| एक | २,२०० ते ३,००० | ८,००० ते १०,००० | 1.वांद्रे "अ" प्रकार<br>2.सहजीवन "अ"प्रकार ,नायगाव<br>3.शिवल ,वरळी<br>4.चंदनवाला, मुलुंड | ४०५<br>४५०<br>४००<br>४०६ | 1.सरस्वती, वरळी<br>2.स्नेहा, वरळी<br>3.कलानगर, वांद्रे | ३००<br>३००<br>३०० |
| दोन | ३,००१ ते ३,५०० | १०,००१ ते ११,००० | 1.फोर्जेट मेन्शन, ताडदेव<br>2.दर्शना, वरळी<br>3.वांद्रे "ब" प्रकार | ६२१<br>६००<br>६३८ ते ७३० | 1.गगनमहल"ब"वरळी | ३०० |
| तीन | ३,५०१ ते ४,००० | ११,००१ ते १२,००० | 1.हाजीअली इ.क्र.६<br>2.तुषार,चर्चगेट<br>3.सागर,चर्चगेट<br>4.साकेत, वरळी | ६८०<br>६३०<br>६३०<br>६५० | 1.पंतनगर इ.क्र.१८६ घाटकोपर | ३५० |
| चार | ४,००१ ते ५००० | १२,००१ ते १५,००० | 1.मंदार, चर्चगेट<br>2.[illegible], चर्चगेट<br>3.हाजीअली "ब" प्रकार<br>4.कावेरी, वरळी<br>5.गोमती, वरळी<br>6.शरावती, वरळी<br>7.बँडमेन्स क्वॉटर्स,मलबार हिल | ७५०<br>७५०<br>६३६ ते ७५७<br>७००<br>७००<br>७००<br>७०० ते ८०० | 1.तुषार, चर्चगेट (एक खोली व स्वयंपाकघर असलेली निवासस्थाने )<br>2.विसावा, वरळी | ३६५<br>४०० |

| १ | २ | ३ | ४ | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पाच | ५,००१ ते ६,००० | १५,००१ ते १८,३९९ | 1.बेलहेवन, मरिन लाईन्स<br>2.यशोधन,चर्चगेट (२ बेडरुम)<br>3.हाजीअली "अ" प्रकार | १३६१<br>१४७०<br>८४८ ते १२२० | 1.तुषार,चर्चगेट (दोन खोल्या व स्वयंपाकघर असलेली निवासस्थाने )<br>2.प्रवासी, वरळी | ४६०<br><br>४०० |
| सहा | ६,००१ आणि त्यापेक्षा अधिक | १८,४०० आणि त्यापेक्षा अधिक | 1.सुरुची, चर्चगेट<br>2.सुनिती, चर्चगेट<br>3.यशोधन.चर्चगेट (३ बेडरुम )<br>4.अंबर,मलबार हिल<br>5.अवंती, मलबार हिल | १६६५<br>१६६५<br>१७५०<br>१७५०<br>१७५० | निरंक | निरंक |

२. गट "ब" चे अधिकारी व कर्मचारी तसेच, गट "क" आणि गट "ड" चे कर्मचारी यांना ते कोणत्या वेतनगटात आहेत ते लक्षात न घेता शासकीय निवासस्थानाचे वाटप केले जाते त्यामुळे त्यांच्याबाबत सध्या अनुज्ञेय असलेल्या निवासस्थानात कोणत्याही प्रकारची सुधारणा किंवा नव्याने कोणत्याही प्रकारचा बदल करण्यात आलेला नाही.

(शरद जोशी)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

1. राज्यपालांचे सचिव
2. मुख्यमंत्र्यांचे सचिव
3. प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळशाखा, मुंबई ( पत्राने )
4. प्रबंधक,उच्च न्यायालय अपील शाखा,मुंबई ( पत्राने )
5. प्रबंधक,लोकआयुक्त व उपलोकआयुक्त,मुंबई ( पत्राने )
6. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई ( पत्राने )
7. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
8. अधिक्षक अभियंता,मुंबई मंडळ,मुंबई
9. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
10. अधिदान व लेखा कार्यालय
11. कार्यकारी अभियंता,इलाखा शहर विभाग,मुंबई
12. कार्यकारी अभियंता,मध्य मुंबई,वरळी
13. कार्यकारी अभियंता,उत्तर मुंबई विभाग,अंधेरी,मुंबई
14. सर्व मंत्रालयीन विभाग
15. निवड नस्ती.